**पुरणमल लाहोटी शासकीय तंत्रनिकेतन, लातूर येथे अल्पसंख्यांक समाजाच्या मुलींसाठी वसतिगृह बांधणेकरीता जागा उपलब्ध करणेस शासन मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा**-२०१५/**प्र.क्र.**८४/२०१५/**तांशि**-३,

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: ४ ऑगस्ट, २०१५.

<u>वाचा -</u>

१) या विभागाचे पत्र क्र.बैठक-२०१३/प्र.क्र.२१३/तांशि-३, दि.२० जून, २०१४.

२) शासन निर्णय, अल्पसंख्यांक विकास विभाग, क्र.वसगृ/२०१३/ प्र.क्र. १७९/का-४, दि.२७/६/२०१४.

३) जिल्हाधिकारी तथा जिल्हादंडाधिकारी, लातूर यांचे क्र.अ.शा.पत्र क्र.२०१४-१५/-जिनिस/अल्पसंख्याक-९/४५८, दिनांक ९ मार्च, २०१५ चे पत्र.

४) मा. प्रधान सचिव (उ.व तं.शि.) यांचेकडे दि.२९/४/२०१५ रोजी आयोजित बैठक.

<u>प्रस्तावना -</u>

पुरणमल लाहोटी शासकीय तंत्रनिकेतन, लातूर या संस्थेच्या आवारात अल्पसंख्यांक समाजाच्या मुलींसाठी वसतिगृह बांधण्याचा निर्णय संदर्भाधीन १ येथील दि.२७/६/२०१४ च्या शासन निर्णयानुसार घेण्यात आला आहे. त्यासाठी यापूर्वी प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, लातूर यांचे दि.७/५/२०१४ चे पत्राव्दारे शिफारस केलेली जागा लातूर शहर विकास योजनेअंतर्गत सार्वजनिक /निमशासकीय प्रयोजनासाठी आरक्षीत असल्याचे निदर्शनास आले आहे. संस्थेच्या परिसरातील अतित्वात असलेल्या मुलींच्या वसतिगृहास लागून असलेली ४१x३६ मिटर इतकी जागा अल्पसंख्यांक मुलींच्या वसतीगृहासाठी उपलब्ध करणे बाबतचा प्रस्ताव जिल्हाधिकारी, लातूर यांनी संदर्भाधीन दि.९/३/२०१५ पत्रान्वये सादर केला होता. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

पुरणमल लाहोटी शासकीय तंत्रनिकेतन, लातूर येथे या संस्थेच्या परिसरातील जिल्हाधिकारी, लातूर यांनी शिफारस केलेली सिटी सर्व्हे क्र.**४३४६** मधील अतित्वात असलेल्या मुलींच्या वसतिगृहास लागून असलेली **४१x३६** मिटर इतकी जागा अल्पसंख्यांक मुलींच्या वसतीगृहासाठी उपलब्ध करणेस शासन मंजुरी देण्यात येत आहे. संदर्भाधीन पत्र क्र.१ नुसार प्रस्तावित वसतिगृह पुरणमल लाहोटी शासकीय तंत्रनिकेतन, लातूर या संस्थेतील मुलींसाठी **३०%** जागा आरक्षीत ठेवण्यात याव्यात

२. सदरचे आदेश मा.प्रधान सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि.२९/४/२०१५ रोजी आयोजित बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार तसेच मा.मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांनी मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०४१७०९३७२१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Audumbar Dharurkar

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2015.08.05 11:09:40 +05'30'

**( संजय औ.धारुरकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, लातूर,
३. प्राचार्य, पुरणमल लाहोटी शासकीय तंत्र निकेतन, लातूर,
४. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, उस्मानाबाद,
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, लातूर,
६. उप विभागीय अभियंता, सा. बांधकाम राजभवन उप विभाग, लातूर,
७. सार्वजनिक बांधकाम विभाग /नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.,
८. अवर सचिव (साशि-१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.,
९. निवड नस्ती/तांशि-३.